**मा. बाळासाहेब ठाकरे माजी सैनिक सन्मान योजनेंतर्गत माजी सैनिक व सैनिक विधवा/पत्नी यांना मालमत्ता करातून सूट देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१०१/भाग-२/का-मासैक**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २८/०३/२०२५.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक संकीर्ण २०२०/प्र.क्र. १०१/भाग़-२/मासैक, दि.२३/११/२०२०

२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१८१४३/टॅक्सेस/सैकवि-१७, दि. १४/०८/२०२४.

**शासन शुद्धीपत्रक :-**

उपरोक्त वाचा येथील संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्यातील माजी सैनिक व सैनिक विधवा/पत्नी यांना मालमत्ता करातून सूट देण्यात येत आहे.सदर शासन निर्णयातील परिच्छेद २ अ मध्ये " या योजनेचे लाभ मिळण्यासाठी सदर माजी सैनिक महाराष्ट्र राज्यात जन्मलेला असावा किंवा महाराष्ट्र राज्याचा किमान १५ वर्षे सलग रहिवासी असावा." असे नमुद केले आहे.

याऐवजी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय परिच्छेद २ अ मधील अट खालीलप्रमाणे वाचावी:-

" या योजनेचे लाभ मिळण्यासाठी सदर माजी सैनिक महाराष्ट्र राज्याचा जन्मतः अधिवासी असावा किंवा त्यांचे आई/वडील/आजी/आजोबा महाराष्ट्र राज्याचे अधिवासी असावेत. इतर राज्यातून महाराष्ट्र राज्यात स्थलांतरीत झालेल्या माजी सैनिकांनी सैन्यसेवेतील निवृत्तीनंतर किमान सलग १५ वर्षे महाराष्ट्र राज्यात वास्तव्य केलेले असावे व या कालावधीमध्ये त्यांनी इतर कोणत्याही राज्यातील सैनिक कल्याण कार्यालयाचे माजी सैनिक ओळखपत्र घेतलेले नसावे.”

२. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०३२८१८१०२०५८०७ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

URMILA POPAT SAWANT

Digitally signed by URMILA POPAT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=532e1c167ebaaff43f5811aa7e45b8f790eb47c4f4cdf5bad586d61ab9901df2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C586C9348CA72192AB033313815E031BC4374F8A3A8575A392F3FE875E8661EC, cn=URMILA POPAT SAWANT
Date: 2025.03.28 18:11:04 +05'30'

(उर्मिला सावंत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्ष नेते, विधान परीषद / विधान सभा, महाराष्ट्र विधान मंडळ, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक.
६. सर्व अतिरिक्त मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधान परीषद / विधान सभा सदस्य व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)
९. आयुक्त सर्व महानगरपालीका.
१०. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
११. आयुक्त तथा संचालक, नगर परीषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१३. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे.
१४. संचालक, सैनिकी सेवापुर्व शिक्षण संस्था, छत्रपति संभाजीनगर
१५. निवडनस्ती.